इचलकरंजी महानगरपालिका सेवा (सेवा प्रवेश व सेवांचे वर्गीकरण) नियम, २०२३ ला मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**नगर विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांक:- इमपा-२०२२/प्र.क्र.९८१/नवि-१८**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
४ था मजला, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- ०२ मे, २०२३

संदर्भ:-

१) शासन अधिसूचना क्र. मनपा-२०२२/प्र.क्र.९६/नवि-१८, दि.२९.०६.२०२२
२) शासन निर्णय क्र. मनपा-२०२२/प्र.क्र.९६/नवि-१८, दि.२७.०७.२०२२
३) प्रभारी अधिकारी तथा प्रशासक, इचलकरंजी महानगरपालिका यांच ठराव क्र. ५९/२०२२, दि.१७.११.२०२२
४) आयुक्त तथा प्रशासक, इचलकरंजी महानगरपालिका यांचे पत्र क्र. जा.क्र.इमपा/आस्था /१२६४/२०२२, दि.१७.११.२०२२
५) शासन निर्णय, नगर विकास विभाग क्र. इमपा-२०२२/प्र.क्र.९८०/नवि-१८, दि.०७.०२.२०२३
६) आयुक्त तथा प्रशासक, इचलकरंजी महानगरपालिका यांचे पत्र क्र. जा.क्र.आयुक्त कार्या. /१/९८/२०२३, दि.१७.०२.२०२३

**प्रस्तावना:-**

इचलकरंजी महानगरपालिका ही "ड" वर्ग महानगरपालिका आहे. महानगरपालिकेचे एकूण क्षेत्रफळ २९.८४ चौ.कि.मी. इतके आहे.

२. इचलकरंजी महानगरपालिका दि.२९.०६.२०२२ रोजीच्या अधिसूचनेन्वये नव्याने गठीत करण्यात आली असुन महानगरपालिका अधिनियमातील तरतुदीनुसार त्यांच्या कर्मचाऱ्यांसाठी सुधारीत सेवा प्रवेश नियम प्रारुपास मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनास सादर केला आहे.

३. इचलकरंजी महानगरपालिका नव्याने गठीत झाल्याने शासनाने दि.०७.०२.२०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये एकुण १७४४ पदांसाठी आकृतीबंध मंजुर केला आहे. दरम्यानच्या कालावधीत शासनाने राज्यातील महानगरपालिकांसाठी ३८ संवर्गाकरीता आकृतीबंध निश्चित करुन दिला होता. त्यानुसार इचलकरंजी महानगरपालिकेसाठी शासनाने दि.२७.०७.२०२२ रोजीच्या शासन निर्णयान्वये ३४ संवर्गातील ४३ पदांकरीता आकृतीबंध मंजूर करुन देण्यात आला. या पदांसह एकूण ११६ संवर्ग असून या पदांचे सेवा प्रवेश नियम निश्चित करण्याची बाब आहे. त्याअनुषंगाने इचलकरंजी महानगरपालिकेच्या सेवा प्रवेश नियमांस मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

इचलकरंजी महानगरपालिकेने महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम, १९४९ च्या कलम-४५७ (३) अनुसार संदर्भ क्र.६ अन्वये शासन मान्यतेसाठी सादर केलेल्या “इचलकरंजी

महानगरपालिका सेवा (सेवा प्रवेश व सेवांचे वर्गीकरण) नियम, २०२३" या नियमास (परिशिष्ट-१ ते ४ सह) महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम, १९४९ च्या कलम-४५४, ४५५,४५६, ४५७ (३) व ४६५ अन्वये शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर नियमांस "इचलकरंजी महानगरपालिका सेवा (सेवा प्रवेश व सेवांचे वर्गीकरण) नियम, २०२३" असे संबोधण्यात यावे.

३. सदर नियम शासन राजपत्रात प्रसिद्ध झाल्याच्या दिनांकापासून अंमलात येतील.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०२३०५०२१७०४३७६३२५ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by ANIRUDDHA V JEWLIKAR
Date: 2023.05.02 17:10:23 +05'30'

**( अनिरुध्द व्यं. जेवळीकर )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा. मुख्यमंत्री महोदय यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा. उप मुख्यमंत्री महोदय यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. अपर मुख्य सचिव (नवि-१) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
४. प्रधान सचिव (नवि-२) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
५. विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे.
६. आयुक्त, इचलकरंजी महानगरपालिका, जि. कोल्हापूर
७. उप सचिव (नवि-१४/१५/२७), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. निवडनस्ती (नवि-१८).

## इचलकरंजी महानगरपालिका सेवा (सेवा प्रवेश व सेवांचे वर्गीकरण ) नियम, २०२३

**महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम, १९४९**

क्रमांक- इमपा-२०२२/प्र.क्र.९८१/नवि-१८ महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम, १९४९ च्या कलम ४५६ (अ) व या अधिनियमातील लागु असलेल्या अन्य तरतुदीव्दारे मिळालेल्या शक्तींचा वापर करून तत्कालीन इचलकरंजी नगरपालिकेकरीता अंमलात असलेले सध्याचे सर्व सेवा प्रवेश नियम यांचे अधिक्रमण करून, महाराष्ट्र शासन, याव्दारे महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम, १९४९ च्या कलम-४५७ (३) अनुसार इचलकरंजी महानगरपालिकेच्या विविध पदांवर करावयाच्या नियुक्त्यांचे नियमन व सेवांचे वर्गीकरण करण्यासाठी खालीलप्रमाणे नियम करीत आहे:-

**नियम**

**१. संक्षिप्त नाव, प्रारंभ व व्याप्ती:-**

(१) या नियमांना "इचलकरंजी महानगरपालिका सेवा (सेवा प्रवेश व सेवांचे वर्गीकरण) नियम, २०२३ असे संबोधण्यात येईल.

(२) हे नियम शासन राजपत्रात प्रसिध्द झाल्याच्या दिनांकापासून अंमलात येतील.

(३) हे नियम इचलकरंजी महानगरपालिकेच्या सर्व मंजूर पदांवरील नियुक्त्यांना लागु होतील, मात्र, अन्यथा नमूद केले नसल्यास, अंशकालिक स्वरुपाच्या नियुक्त्या, कंत्राटी पध्दतीने किंवा रोजंदारी तत्वावरील नियुक्त्या तसेच मानसेवा स्वरुपाच्या नियुक्त्यांना लागु होणार नाहीत.

**२. व्याख्या:-**

विषय किंवा संदर्भानुसार अन्य अर्थ अभिप्रेत नसल्यास, या नियमांसाठी-

(१) "शासन" म्हणजे, महाराष्ट्र शासन.

(२) "अधिनियम" म्हणजे, महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम, १९४९

(३) "आयोग" म्हणजे, महाराष्ट्र लोकसेवा आयोग

(४) "महानगरपालिका" म्हणजे, महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम, १९४९ च्या तरतुदी अन्वये निर्माण केलेली "इचलकरंजी महानगरपालिका."

(५) "महापौर" म्हणजे, इचलकरंजी महानगरपालिकेचे महापौर.

(६) "आयुक्त" म्हणजे, महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम, १९४९ मधील कलम-३६ अन्वये शासनाने नियुक्त केलेला अधिकारी.

(७) "सक्षम प्राधिकारी" म्हणजे, इचलकरंजी महानगरपालिकेचे आयुक्त.

(८) "नियुक्ती प्राधिकारी" म्हणजे, महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम, १९४९ च्या कलम-५३ च्या पोटकलम-(१) ते (३) च्या तरतुदीप्रमाणे नियुक्ती देण्यास सक्षम असलेला अधिकारी.

(९) "निवड प्राधिकारी" म्हणजे, या नियमातील परिशिष्ट -(१) मध्ये विनिर्दिष्टीत केलेली कर्मचारी निवड समिती.

(१०) "अधिकारी/ कर्मचारी" म्हणजे, महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम, १९४९ मधील प्रकरण-४, कलम-५१ (४) अन्वये नेमणूक केलेले अधिकारी/ कर्मचारी. परंतु, यात

रोजंदारीवर, हजेरीपटावर असलेले कामगार आणि कंत्राटी पध्दतीने, तसेच अंशकालीन व मानद स्वरुपी नेमण्यात आलेल्या व्यक्तींचा समावेश होत नाही.

(११) "संवर्ग" म्हणजे, एखाद्या सेवेतील किंवा एखाद्या सेवेच्या भागातील स्वतंत्र घटक म्हणून मंजूर केलेल्या "कायम त्याचप्रमाणे हंगामी" शासन मान्य पदांचा समूह.

(१२) "कलम" म्हणजे, महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम, १९४९ चे कलम.

(१३) "परिशिष्ट" म्हणजे, या नियमांना जोडलेले परिशिष्ट.

(१४) "जोडपत्र" म्हणजे, या नियमांना जोडलेले जोडपत्र.

(१५) "अनुसुची" म्हणजे, या नियमांना जोडण्यात आलेली अनुसूची.

(१६) "विभागीय परीक्षा" म्हणजे, इचलकरंजी महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील अधिकारी / कर्मचारी यांच्यासाठी विहीत केलेली व या नियमांच्या परिशिष्ट-(३) मध्ये नमूद करण्यात आलेली विभागीय परीक्षा.

(१७) "पदवी" म्हणजे, संसदेच्या अधिनियमाव्दारे किंवा भारतातील राज्य विधीमंडळाव्दारे विधि संस्थापित असलेले कोणतेही विद्यापीठ किंवा संसदेच्या अधिनियमाव्दारे किंवा तत्सम अधिनियमाव्दारे स्थापन करण्यात आलेल्या कोणत्याही शैक्षणिक संस्थेतुन प्राप्त केलेली पदवी.

(१८) "पदविका" म्हणजे, संसदेच्या अधिनियमाव्दारे किंवा भारतातील राज्य विधीमंडळाव्दारे विधी संस्थापित असलेले कोणतेही विद्यापीठ किंवा तंत्र शिक्षण मंडळ किंवा संसदेच्या अधिनियमाव्दारे किंवा तत्सम अधिनियमाव्दारे स्थापन करण्यात आलेल्या कोणत्याही शैक्षणिक संस्थेतुन / तंत्रनिकेतनातुन प्राप्त केलेली पदविका.

(१९) "व्यावसायिक अर्हता" (Professional Qualification) म्हणजे, अग्निशमन अभियांत्रिकी पदवी (B.E. Fire), अग्निशमन अभियांत्रिकी उच्च शिक्षा पदविका (Advanced Diploma in Fire Engineering), अग्निशमन अभियांत्रिकी पदविका (Diploma in Fire Engineering) उप अग्निशमन अधिकारी हे पाठ्यक्रम (राष्ट्रीय अग्निशमन सेवा महाविद्यालय, नागपूर किंवा राज्य अग्निशमन प्रशिक्षण अकादमी, मुंबई मधून उत्तीर्ण झालेले अथवा Institute of Fire (U.K) किंवा (India) या संस्थेमधून M.I. (Fire) किंवा Grade (I) (Fire) उत्तीर्ण झालेले. )

(२०) "स्वीयेत्तर सेवा" (Foreign Service) म्हणजे, ज्या सेवेत इचलकरंजी महानगरपालिकेच्या कर्मचाऱ्याला त्यांचे वेतन व भत्ते महानगरपालिकेच्या निधी व्यतिरिक्त अन्य कोणत्याही साधनाव्दारे मिळतात, अशी सेवा.

(२१) "मुलाखत" म्हणजे, इचलकरंजी महानगरपालिकेच्या पदावरील / पदांवरील नियुक्तीकरिता अर्ज केलेल्या उमेद्वारांची सक्षम निवड प्राधिकाऱ्याने / निवड समितीने, ज्या पदांकरीता त्याने किंवा तिने अर्ज केला आहे, त्या पदांवरील नियुक्तीकरीता निवड करण्यासाठी अशा रितीने मुलाखत घेण्यात आलेल्या उमेद्वारांची योग्यता किंवा अन्यथा मुल्यमापन करण्याच्या उद्देशाने आणि अशा मुलाखत घेण्यात आलेल्या उमेद्वारांना मिळालेल्या गुणांच्या आधारे अनुक्रम लावण्यासाठी घेतलेली मुलाखत, असा आहे.

(२२) "समतुल्य/ समकक्ष अर्हता" म्हणजे, संबंधित अर्हतेला समान म्हणून शासनाकडून जाहीर केलेली अर्हता, असा आहे आणि याबाबत कोणताही संदेह/ वाद उद्भवल्यास शासनाचा निर्णय अंतिम असेल.

(२३) "मान्यताप्राप्त शैक्षणिक संस्था" म्हणजे, शासनाची मान्यता असलेली संस्था, असा आहे.

(२४) "मान्यताप्राप्त विद्यापीठ" म्हणजे, सक्षम प्राधिकाऱ्याची मान्यता असलेले विद्यापीठ, असा आहे.

(२५) "माध्यमिक शालांत प्रमाणपत्र परीक्षा" म्हणजे, महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळाकडून घेण्यात येत असलेली माध्यमिक शालांत प्रमाणपत्र परीक्षा, असा आहे आणि यात शासनाने या परीक्षेशी समान म्हणून जाहीर केलेल्या कोणत्याही इतर परीक्षेचा समावेश आहे.

(२६) "उच्च माध्यमिक शालांत प्रमाणपत्र परीक्षा" म्हणजे, महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळाकडून घेण्यात येत असलेली उच्च माध्यमिक शालांत प्रमाणपत्र परीक्षा, असा आहे आणि यात शासनाने या परीक्षेशी समान म्हणून जाहीर केलेल्या कोणत्याही इतर परीक्षेचा समावेश आहे.

(२७) "औद्योगिक प्रशिक्षण संस्था" म्हणजे, राज्य शासनाने विविध प्रकारच्या औद्योगिक व्यवसायाचे प्रशिक्षण देण्यासाठी तयार केलेले औद्योगिक प्रशिक्षण केंद्र.

(२८) "समय श्रेणी वेतन" म्हणजे, असे वेतन जे, या नियमात घालून देण्यात आलेल्या कोणत्याही शर्तीच्या अधीन किमान पासून कमाल पर्यंत नियतकालिक वेतनवाढीने वाढते.

(२९) "लेखी परीक्षा" म्हणजे, इचलकरंजी महानगरपालिकेकडून, योग्य रितीने नामनिर्देशित करण्यात आलेल्या एखाद्या अभिकरणाकडून, पदाकरीता अर्ज करणाऱ्या उमेद्वारांच्या योग्यतेचे किंवा अन्यथा मूल्यमापन करण्याच्या प्रयोजनाकरीता घेतलेली परीक्षा आणि त्या लेखी परीक्षेतील उमेद्वारांच्या कामगिरीचा संबंध असेल, तेथवर त्यांच्या गुणवत्तेचा क्रम लावण्याच्या उद्देशाने घेतलेली परीक्षा, असा आहे.

(३०) "व्यावसायिक परीक्षा" म्हणजे, उमेद्वारांच्या तांत्रिक कौशल्याचे मुल्यमापन करण्यासाठी इचलकरंजी महानगरपालिकेने एखाद्या अभिकरणाकडून अथवा शासकीय/ निमशासकीय कार्यालयामार्फत आयोजित केलेली परीक्षा, असा आहे.

(३१) "निवड समिती अध्यक्ष" म्हणजे, कर्मचारी/ अधिकारी निवड समितीसाठी सक्षम प्राधिकारी यांनी निवड समिती अध्यक्ष म्हणून नियुक्त केलेले अधिकारी.

(३२) "एकीकृत संवर्ग" म्हणजे, विविध पदांच्या कर्तव्याचे स्वरुप, ती पदे धारण करण्यासाठी विहित केलेली शैक्षणिक अर्हता, अनुभव, वेतनश्रेणी यांचा सारासार विचार करून सेवा नियमासाठी एकीकृत केलेला संवर्ग.

(३३) "अर्हताप्राप्त कर्मचारी" म्हणजे, नियमाच्या परिशिष्ट-(२) मध्ये विहीत केलेली अर्हता धारण करणारे कर्मचारी.

या नियमात वापरण्यात आलेल्या, परंतु व्याख्या न केलेल्या शब्द किंवा शब्द समुहांचा अर्थ महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम, १९४९ मध्ये दिल्यानुसार असेल.

**३. सेवांचे वर्गीकरण (Classification of Services):-**

**(३.१) प्रशासकीय सेवा:-** सामान्य प्रशासन, परिमंडळ कार्यालय प्रशासन, प्रभाग प्रशासन, कर व महानगरपालिका सचिवालय अंतर्गत असलेल्या विभागातील सेवा या "प्रशासकीय सेवा" संबोधण्यात येतील.

**(३.२) लेखा सेवा व लेखा परीक्षण सेवा:-** महानगरपालिकेच्या आर्थिक व्यवस्थापनाशी संबंधित (अर्थसंकल्प, लेखा, लेखा परीक्षण, लेखा आक्षेप निराकरण व खर्च व्यवस्थापन इत्यादी) सेवांतील पदांना "लेखा संवर्ग व लेखापरीक्षण संवर्ग" असे संबोधले जाईल व अशा पदांची सेवा "लेखा सेवा व लेखापरीक्षण सेवा" संबोधण्यात येईल.

**(३.३) तांत्रिक सेवा:-** ज्या पदावरील नियुक्तीसाठी मान्यताप्राप्त विद्यापीठाची अभियांत्रिकी पदवी/ पदविका, सांविधिक विद्यापीठ / अभिमत विद्यापीठ / राज्य तंत्रशिक्षण मंडळ (Board of Technical Education) वा केंद्रीय तंत्र शिक्षण मंडळ (Board of Central Technical Education), तंत्र शिक्षण परिषद (Technical Council) यांचेमार्फत चालविले जाणारे विविध तांत्रिक व अभियांत्रिकीविषयक अभ्यासक्रमाची किमान शैक्षणिक अर्हता विहीत केली असेल अशा पदांची सेवा "तांत्रिक सेवा" संबोधण्यात येईल.

**(३.४) वैद्यकीय सेवा:-** ज्या पदावरील नियुक्तीसाठी मान्यताप्राप्त विद्यापीठाचा वैद्यकीय शास्त्राचा पदवीधारक, पदव्युत्तर पदवीधारक/ पदविकाधारक, तसेच मेडिकल कौन्सिल ऑफ इंडिया, आयुष वा तत्सम आयुर्वेदिक कौन्सिल यांच्याकडील नोंदणी ही किमान शैक्षणिक अर्हता विहीत केली असेल, अशा पदांची सेवा "वैद्यकीय सेवा" संबोधण्यात येईल.

**(३.५) निमवैद्यकीय सेवा:-** वैद्यकीय सेवेतील पदांना सहाय्यकारी असणाऱ्या पदांच्या संवर्गाला, उदा. अधिसेविका, सहाय्यक अधिसेविका, परिचारिका, प्रयोगशाळा तंत्रज्ञ, क्ष-किरण तंत्रज्ञ, रक्तपेढी तंत्रज्ञ, औषध निर्माता /औषध निर्माण अधिकारी इत्यादी पदांच्या सेवेला "निमवैद्यकीय सेवा" संबोधण्यात येईल.

**(३.६) सार्वजनिक आरोग्य सेवा:-** घनकचरा व्यवस्थापन विभागाशी संबंधित अधिकारी/ कर्मचारी- उदा. मुख्य स्वच्छता अधिकारी, उपमुख्य स्वच्छता अधिकारी, स्वच्छता अधिकारी, स्वच्छता निरीक्षक, उपस्वच्छता निरीक्षक, मुकादम आणि सफाई कामगार व तत्सम पदांच्या सेवेला "सार्वजनिक आरोग्य सेवा" संबोधण्यात येईल.

**(३.७) अग्निशमन संवर्ग आणि सेवा:-** महाराष्ट्र आग प्रतिबंधक व जीव सुरक्षा उपाययोजना अधिनियम, २००७ मध्ये समाविष्ट असलेल्या सेवेला "अग्निशमन सेवा" संबोधण्यात येईल.

**४. इचलकरंजी महानगरपालिका सेवांचे गट पुढीलप्रमाणे असतील:-**

(१) अधिकारी-गट- अ व गट- ब

(२) कर्मचारी-गट- क व गट-ड

## ५. नेमणूकीची पध्दत व अर्हता:-

**(५.१) नियुक्तीची पध्दत:-** महानगरपालिकेतील विविध पदांवर नियुक्तीची कार्यपध्दती परिशिष्ट-(१) मध्ये विहीत केल्यानुसार व शिक्षण, अनुभव इत्यादी आवश्यक अर्हता परिशिष्ट-(२) मध्ये विहीत केल्याप्रमाणे असतील. नियुक्तीची पध्दत महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम, १९४९ च्या कलम-५४ व अनुसूची-ड मधील प्रकरण-३ नुसार असेल.

**(५.२) भारतीय नागरिकत्व आणि महाराष्ट्र राज्याचे अधिवास प्रमाणपत्र:-** उमेव्दार भारताचा नागरीक असावा आणि महाराष्ट्रात १५ वर्ष अधिवास (Domicile) करीत असल्याबाबत त्याने सक्षम प्राधिकरणाचे प्रमाणपत्र किंवा महाराष्ट्रात जन्म झाल्याबाबत जन्म दाखला अर्जासोबत सादर करणे आवश्यक राहील.

**(५.३) संगणक हाताळणी / वापराबाबतच्या ज्ञानाची आवश्यकता:-** परिशिष्ट- (२) मध्ये विहीत केलेल्या अर्हतेव्यतिरिक्त गट-ड वगळता इतर पदांवरील नेमणुकीसाठी शासन वेळोवेळी आदेश काढून निश्चित करेल, असे संगणक हाताळणी/ वापराबाबतचे ज्ञान (महाराष्ट्र राज्य उच्च व तंत्र शिक्षण मंडळ, मुंबई यांचेकडील अधिकृत MS-CIT किंवा DOEEACC सोसायटीच्या अधिकृत CCC किंवा O/A/B/C स्तर पैकी कोणतीही एक परीक्षा उत्तीर्ण झाल्याचे प्रमाणपत्र इत्यादी), एक अतिरिक्त आवश्यक अर्हता असेल.

**(५.४) वयोमर्यादा:-** महानगरपालिकेतील कोणत्याही पदावर नामनिर्देशनाने नियुक्तीसाठी किमान वयाची अट १८ वर्षे पूर्ण व कमाल वयोमर्यादा महाराष्ट्र शासनाचे प्रचलित नियम व त्या अनुषंगाने वेळोवेळी काढण्यात आलेले शासन निर्णयात नमूद केल्यानुसार असेल. सामाजिक आरक्षण लागू असणाऱ्या प्रवर्गाकरिता प्रचलित शासन निर्णयानुसार वयोमर्यादा शिथिलक्षम असेल.

**(५.५) पदोन्नती व नामनिर्देशनाव्दारे करावयाच्या नियुक्त्यांचे प्रमाण:-**

**(क)** नामनिर्देशन वा पदोन्नतीचे प्रमाण परिशिष्ट-(२) मध्ये संबंधित पदासमोर दर्शविल्यानुसार असेल.

**(ख)** पदोन्नतीच्या साखळीतील एकाकी पद सामान्यत: पदोन्नतीने भरण्यात येईल. तथापि, विशिष्ट अर्हता आवश्यक असलेल्या एकाकी पदावर पदोन्नतीने नियुक्तीसाठी उमेदवार उपलब्ध नसल्यास तसे पद प्रतिनियुक्तीने भरता येईल. तरीही उमेदवार उपलब्ध होत नसल्यास एखाद्या विशिष्ट प्रकरणी सदर पद शासन मान्यतेने नामनिर्देशन / सरळसेवेने भरता येईल.

## ६. पदोन्नतीने नेमणूक करणे:-

पदोन्नतीने करावयाची कोणतीही नियुक्ती, जेष्ठता-नि-पात्रता या तत्त्वावर अर्हताप्राप्त कर्मचाऱ्यांमधून केली जाईल. महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम, १९४९ मधील कलम-४५ अंतर्गत येणारी पदे तसेच वर्ग-१ ची इतर पदे पदोन्नतीने भरताना, सर्वसाधारण सभेच्या ठरावानंतर त्यास शासनाची पुर्वमंजूरी घेतल्यानंतरच पदोन्नतीने भरता येतील.

**७. प्रतिनियुक्तीव्दारे नेमणूक:-**

या नियमांमध्ये विहीत केलेल्या अर्हतेनुसार महानगरपालिकेतील ज्या पदांवर प्रतिनियुक्तीव्दारे नेमणूक करण्याची तरतुद आहे, अशी पदे केंद्र शासन, राज्य शासन, इतर स्थानिक स्वराज्य संस्था व स्थानिक प्राधिकरणातील अधिकाऱ्यांमधून शासनाच्या प्रचलित धोरणानुसार प्रतिनियुक्तीने भरता येतील. सदर प्रतिनियुक्तीचा कालावधी हा शासनाच्या प्रचलित नियमापेक्षा अधिक असणार नाही. सदर प्रतिनियुक्तीचा कालावधी संपताच संबधित अधिकारी/ कर्मचारी यांची प्रतिनियुक्ती आपोआप संपुष्टात येईल.

**८. महानगरपालिकेतील अधिकारी / कर्मचारी यांच्या बदल्या:-**

महानगरपालिकेतील अधिकारी / कर्मचाऱ्यांच्या बदल्या महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ तसेच या संदर्भात वेळोवेळी शासनाने दिलेल्या निर्देशानुसार करणे आवश्यक राहील.

**९. एका महानगरपालिकेतून दुसऱ्या महानगरपालिकेत कायमस्वरुपी बदलीने नियुक्ती:-**

या नियमात अन्यत्र काहीही नमूद केले असले तरी, एका महानगरपालिकेतील एखाद्या कर्मचाऱ्याने अन्य महानगरपालिकेतील सम संवर्गीय पदावर बदलीने नियुक्तीसाठी अर्ज केल्यास, महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम, १९४९ मधील तरतुदीनुसार व दोन्ही महानगरपालिकांतील नियुक्ती प्राधिकाऱ्यांच्या परस्पर संमतीने मान्य होतील, अशा अटी व शर्तीवर, खालील बाबींच्या अधीन राहून कायमस्वरुपी बदलीने नियुक्ती देता येईल.

**अ)** पदोन्नतीने भरण्यात येणाऱ्या पदांवर कायमस्वरुपी बदलीने नियुक्ती करता येणार नाही. फक्त नामनिर्देशन /सरळसेवेने नियुक्तीकरीता राखून ठेवण्यात आलेल्या समसंवर्गीय व समान वेतन श्रेणीच्या रिक्त पदांवर कायमस्वरुपी बदलीने नियुक्ती करण्यात यावी.

**ब)** अशी नियुक्ती झाल्यानंतर, त्या पदधारकाची जेष्ठता नियुक्तीच्या दिनांकास त्या पदाच्या संवर्गात सर्वात कनिष्ठ (Zero Seniority) राहील.

**क)** गट-अ आणि गट-ब मधील अधिकाऱ्यांच्या बाबतीत अन्य महानगरपालिकेतून इचलकरंजी महानगरपालिकेत बदलीचा निर्णय दोन्ही महानगरपालिकांच्या परस्पर संमतीने निश्चित अटी व शर्तीवर शासन मान्यतेने घेतला जाईल.

**ड)** केवळ विहीत प्रक्रियेव्दारे व शासनमान्य पदावर नियुक्त असलेल्या कर्मचाऱ्यांचाच विचार केला जाईल.

**१०. परीविक्षाधीन कालावधी:-**

गट-अ आणि गट-ब मध्ये नामनिर्देशन / सरळसेवेने नियुक्ती देण्यात आलेल्या उमेदवारांसाठी परीविक्षाधीन कालावधी त्यांच्या नेमणूकीच्या मूळ दिनांकापासून दोन वर्षाचा असेल. राज्य शासनाच्या लागू असलेल्या अटी-शर्तीनुसार परीविक्षाधीन कालावधी पुर्ण केल्याचे आदेश निर्गमित करण्यात येतील. तसेच अशा उमेद्वारांचे परीविक्षाधीन कालावधीतील काम समाधानकारक नसल्यास अपवादात्मक बाब म्हणून आणि तत्संबंधी कारणे नमूद करून परीविक्षा कालावधी पुढील १ वर्षापर्यंतच वाढविता येईल. तद्नंतरही या वाढीव कालावधीत काम समाधानकारक नसल्यास सदर कर्मचाऱ्याची सेवा समाप्त करण्यात येईल.

**११. <u>भाषा परीक्षा, विभागीय परीक्षा व त्याबाबत प्रशिक्षण:-</u>**

महानगरपालिका सेवेतील पदांवर नेमणूक करण्यात आलेल्या किंवा त्यासाठी निवडण्यात आलेल्या उमेदवारांनी:-

(१) परिशिष्ट (३) अन्वये विहीत करण्यात येतील अशा भाषा परीक्षा आणि / किंवा चाचण्या उत्तीर्ण होणे किंवा त्यांना विहीत नियमानुसार यापैकी कोणतीही परीक्षा पास होण्यापासून सूट मिळविणे आवश्यक असेल.

(२) परिशिष्ट (३) अन्वये विहीत केलेली विभागीय परीक्षा उत्तीर्ण होणे अथवा अशी परीक्षा उत्तीर्ण होण्यापासून सूट मिळविणे आवश्यक असेल.

(३) वेळोवेळी ठरवून देण्यात येईल असे, सेवा प्रवेशपुर्व आणि / किंवा सेवा प्रवेशोत्तर प्रशिक्षण घेणेसुध्दा आवश्यक असेल.

**१२. <u>महानगरपालिका सेवेतील पदावर नियुक्तीसाठी अनर्हता:-</u>**

एखाद्या व्यक्तीस:-

(क) महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम, १९४९ च्या कलम-५९ च्या तरतुदीप्रमाणे अनर्ह ठरविण्यात आले असेल, किंवा

(ख) महानगरपालिकेच्या सेवेतून किंवा कोणत्याही स्थानिक प्राधिकरणाच्या सेवेतून किंवा कोणत्याही सरकारी सेवेतून गैरवर्तणुकीबद्दल बडतर्फ करण्यात आले असेल, किंवा

(ग) ज्यामध्ये नैतिक अध:पतनाचा समावेश होईल, अशा अपराधाबद्दल तिला दोषी ठरविण्यात आले असेल, किंवा

(घ) जर त्याच्या एकापेक्षा अधिक पत्नी हयात असतील आणि स्त्री उमेव्दारांच्या बाबतीत जर तिने ज्याची पत्नी हयात आहे अशा व्यक्तीशी विवाह केला असेल, किंवा

(च) महाराष्ट्र नागरी सेवा (लहान कुटुंबाचे प्रतिज्ञापन) नियम, २००५ नुसार अनर्ह ठरत असेल, किंवा

(छ) न्यायालयात ज्या गुन्ह्यासाठी कैदेची शिक्षा फर्मावता येते, अशा गुन्ह्यासाठी सहा महिन्याहून अधिक मुदतीची कैदेची शिक्षा झाली असेल व ती शिक्षा अपील वा पुनरिक्षणात रद्द झाली नसेल, अशी व्यक्ती, किंवा

(ज) महानगरपालिकेच्या सेवेत असताना सिध्दपराध होऊन सहा महिन्यांपेक्षा अधिक मुदतीची कैदीची शिक्षा झाली असेल व ती शिक्षा अपील व पुन:रिक्षणात रद्द झाली नसेल,

अशी व्यक्ती महानगरपालिकेच्या सेवेत नेमणूक देण्यास वा नेमणूक चालू ठेवण्यास अपात्र समजली जाईल.

**१३. <u>महानगरपालिका सेवेतील पदांवर आरक्षण:-</u>**

महानगरपालिका सेवेतील पदांना शासनाच्या प्रचलित धोरणानुसार आरक्षण लागू असेल. यामध्ये मागासवर्गीयांसाठी आरक्षण (सामाजिक आरक्षण), विशेष / समांतर आरक्षण, सामाजिक व शैक्षणिक मागास प्रवर्ग, माजी सैनिक, प्रकल्पग्रस्त, दिव्यांग, महिला, खेळाडू इत्यादीसाठीच्या आरक्षणाचा समावेश असेल.

**१४. शारिरीक पात्रता प्रमाणपत्र आणि चारित्र्य पडताळणी अहवालः-**

महानगरपालिका सेवेतील कोणत्याही पदावरील नामनिर्देशन /सरळसेवेने नियुक्ती,

(अ) महानगरपालिकेच्या / शासकीय सक्षम वैद्यकीय अधिकाऱ्याचे विहीत नमुन्यातील आरोग्यविषयक वैद्यकीय प्रमाणपत्र सादर केल्यानंतर, आणि

(ब) उमेव्दाराच्या पूर्वचारित्र्य पडताळणीबाबत (Verification of Antecedents) पोलीस विभागाचे / सक्षम प्राधिकाऱ्याकडून अहवाल प्राप्त झाल्यानंतर केली जाईल.

**१५. परीक्षेकरीता/ मुलाखतीकरीता केलेल्या प्रवासाचा खर्चः-**

नामनिर्देशन/ सरळसेवेव्दारे नियुक्ती करण्याच्या बाबतीत, परीक्षेच्या / मुलाखतीच्या प्रयोजनाकरिता उमेव्दारांना करावे लागणारे सर्व प्रवास हे, याबाबतीत काही विनिर्दिष्ट प्रवर्गाच्या उमेदवारांच्या संबंधात वेळोवेळी शासन / महानगरपालिकेकडून मंजूर करण्यात आलेल्या कोणत्याही सवलतीच्या अधीन राहून, स्वत:च्या खर्चाने असतील. याबाबतचा अंतिम निर्णय घेण्याचा अधिकार सक्षम प्राधिकारी यांना असेल.

**१६.नियुक्तीकरीता निवड झाल्यावर पदस्थापनाः-**

नियुक्तीकरीता निवड झालेले उमेव्दार हे इचलकरंजी महानगरपालिकेच्या हद्दीत कोठेही किंवा इचलकरंजी महानगरपालिकेच्या हद्दीच्या बाहेर महानगरपालिकेचे कार्यालय जेथे असेल तेथे किंवा महानगरपालिका भविष्यकाळात कार्यालय सुरु करू शकेल, तेथे पदस्थापना केले जाण्यास पात्र ठरतील.

**१७. प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष दबावतंत्राचा वापरः-**

कोणत्याही उमेदवाराच्या नियुक्तीसंदर्भात प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्षरित्या दबाव आणण्याचा केलेला प्रयत्न हा त्या उमेदवाराला त्या पदावरील नियुक्तीसाठी अनर्ह करणारा ठरेल.

**१८.** हे नियम अस्तित्वात येण्यापूर्वी विहीत मार्गाने झालेल्या सरळसेवा नियुक्त्यांना शासनाने अन्यथा वेगळी लेखी कारणे नमुद करून निर्देश दिले नसतील तर या नियमातील तरतुदीमुळे बाधा येणार नाही.

**१९.** वेळोवेळी सरळसेवा / पदोन्नती / प्रतिनियुक्ती प्रमाण व पध्दती सेवाभरती / आरक्षण / वयोमर्यादा/परीविक्षाधीन कालावधी नियमित करणे, इत्यादीबाबत निर्देश देणारे राज्य शासनाचे नियम, अधिनियम, निर्णय व न्यायनिर्णय यानुसार या नियमात सुधारणा (Amendment) करण्यात येईपर्यंत या शासन निर्णय / न्याय निर्णयानुसार कार्यवाही करणयात येईल.

**२०.** सरळसेवा / पदोन्नतीने नियुक्त झालेल्या अधिकारी / कर्मचाऱ्यांसाठी राज्य शासनाने वेळोवेळी विहीत केलेल्या प्रशिक्षण धोरणाची अंमलबजावणी करावी.

**२१.** या नियमामधील कोणत्याही तरतुदीच्या अर्थविवरणाबाबत शंका उद्भवल्यास सदर बाब शासनाकडे निर्देशित करण्यात येईल व त्याबाबतीत शासनाचा निर्णय हा अंतिम राहील.

Digitally signed by ANIRUDDHA V JEWLIKAR
Date: 2023.05.02 17:10:43 +05'30'

**(अनिरुध्द व्यं. जेवळीकर)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**वैद्यकीय प्रमाणपत्राचा नमुना**

(महाराष्ट्र नागरी सेवा (सेवेच्या सर्वसाधारण शर्ती) नियम, १९८१ मधील नियम-११ पहा.)

मी याव्दारे प्रमाणित करतो/ करते की, ____________________________इचलकरंजी महानगरपालिकेच्या (                    ) संवर्गातील (                ) या पदावर नेमणूक करण्यासाठी असलेल्या उमेव्दारांची तपासणी केली आणि त्याला / तिला ______________________ अतिरिक्त (सांसर्गिक किंवा अन्य) कोणताही रोग, शारीरिक दौर्बल्य किंवा शारीरिक अपंगत्व असल्याचे आढळले नाही ही गोष्ट (            ) कार्यालयात (                          ) म्हणून नेमणूकीसाठी अनर्ह ठरविणार आहे असे मला वाटत नाही.

श्री./ श्रीमती ___________________________ यांच्या स्वत:च्या निवेदनावरून त्याचे / तिचे वय ________ वर्षे आहे आणि दिसण्यावरून तो/ ती सुमारे __________वर्षे वयाचा/ वयाची आहे. त्याला/ तिला लस टोचण्यात आली आहे.

ओळख चिन्हे ________________________________

डाव्या हाताच्या अंगठ्याचा ठसा ________________________________

वैद्यकीय अधिकाऱ्याचे नाव ________________________________

वैद्यकीय अधिकाऱ्याची स्वाक्षरी ________________________________

**वैद्यकीय अधिकाऱ्याचे पदनाम**
**( शिक्क्यासह )**

**परिशिष्ट-(१)**

**इचलकरंजी महानगरपालिका सेवा (सेवा प्रवेश व सेवांचे वर्गीकरण) नियम, २०२३ अंतर्गत सेवा भरतीसाठी अनुसरावयाची कार्यपध्दती:-**

**१. अधिकारी / कर्मचारी निवड समिती:-**

महानगरपालिका पदांवर नियुक्तीकरीता महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम, १९४९ च्या कलम-५४ मध्ये विहीत केल्यानुसार कर्मचारी निवड समिती गठीत करण्यात येईल. सदर समिती गठीत करण्यात आलेल्या दिनांकापासून एक वर्ष कालावधीकरीता अथवा भरती प्रक्रिया पुर्ण होईपर्यंतच्या कालावधीकरीता (यातील जो कालावधी कमी असेल, त्या कालावधीकरीता वैध राहील.

याव्यतिरिक्त, नामनिर्देशन / सरळसेवेने नियुक्ती करताना, मागासवर्गीय तसेच महिला उमेव्दारांच्या हितरक्षणासाठी अशा समितीचे सदस्य म्हणून शासनाच्या प्रचलित आदेशानुसार संबंधित विभागाच्या अधिकाऱ्यांना मुलाखतीच्या वेळेस विशेष निमंत्रित म्हणून बोलावले जाईल.

**२. नामनिर्देशन / सरळसेवेव्दारे करावयाच्या नियुक्तीसाठी कर्मचारी निवड समितीची रचना खालीलप्रमाणे असेल:-**

| | |
|---|---|
| १) आयुक्त किंवा आयुक्तांनी पदनिर्देशित केलेला अन्य कोणताही अधिकारी | - अध्यक्ष |
| २) मुख्य लेखा परीक्षक | - सदस्य |
| ३) संबंधित विभाग प्रमुख | - सदस्य |
| ४) आयुक्तांनी नामनिर्देशित केलेला मागासवर्गीय प्रवर्गातील अधिकारी | - सदस्य |
| ५) जिल्हा महिला व बालकल्याण अधिकारी | - सदस्य |
| ६) जिल्हा समाजकल्याण अधिकारी | - सदस्य |
| ७) प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प | - सदस्य |
| ८) उप आयुक्त (सामान्य प्रशासन) | - सदस्य सचिव व निमंत्रक |

**३. नामनिर्देशन / सरळसेवेव्दारे नेमणूकीकरीता कार्यपध्दती:-**

**(३.१)** महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत भरावयाची महानगरपालिकेमधील पदे निश्चित करून सदर पदे भरण्यासंदर्भात शासनाने निर्देश दिल्यानंतर संबंधित पदे महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत भरण्याची कार्यवाही करण्यात यावी.

**(३.२)** महानगरपालिकेतील पदे भरण्यासंदर्भात पुढील कार्यपध्दती अनुसरण्यात यावी:-

**(३.२.१)** एखाद्या पदावरील नियुक्तीसाठी, ऑनलाईन / वृत्तपत्रातील जाहिरातीला अनुसरून किंवा महानगरपालिकेच्या सूचना फलकावरील सुचनेस अनुसरून विहीत मुदतीत प्राप्त झालेल्या अर्जाचा किंवा सेवा विनियम केंद्राकडून वा शासनाच्या आदेशानुसार अन्य संस्था / कार्यालयाकडून आलेल्या यादीतील उमेव्दाराच्या नावाचाच विचार करण्यात येईल.

**(३.२.२)** उमेव्दाराने अर्जात दिलेल्या तपशीलाबाबत अधिक माहिती मागविण्याचा अधिकार आयुक्तांना असेल.

**(३.२.३)** जाहिरातीत / सेवा विनिमय केंद्राकडे पाठविलेल्या मागणी पत्रात लेखी चाचणीचा उल्लेख असल्यास, अशा उमेव्दारांना लेखी चाचणी द्यावी लागेल.

**(३.२.४)** चाचणी परीक्षेत किमान ५०% गुण मिळविण्याच्या मर्यादेच्या अधीन राहून रिक्त पदाच्या तिप्पट एवढ्या उमेव्दारांना मुलाखतीकरीता बोलविण्यात येईल. वरील (३.२.३) च्या निर्णयाप्रमाणे चाचणी परीक्षा न घेतल्यास, अशा सर्व निर्देशित पात्रता धारण करणाऱ्या उमेव्दारांना मुलाखतीसाठी बोलविण्यात येईल व अशा उमेव्दारांची यादी निवड समितीच्या प्रत्येक सदस्यास मुलाखतीच्या वेळी पुरविण्यात येईल. परंतु, अनुसूचित जाती / अनुसूचित जमाती / विमुक्त जाती व भटक्या जमाती / विशेष मागास प्रवर्ग / सामाजिक आणि शैक्षणिक मागास प्रवर्ग / इतर मागासवर्गीय उमेव्दारांसाठी ५०% ऐवजी ४५% गुण मिळविण्याची अट राहील.

**(३.२.५)** मुलाखतीत खालील बाबींवर विशेष लक्ष दिले जाईल:-

**(अ)** सामाजिक प्रश्नाबाबतची जाणीव.

**(ब)** पुर्वानुभव - ज्या पदावर नेमणूक द्यावयाची त्या पदासाठी आवश्यक असा अनुभव.

**(क)** सेवा भरती नियमात विशेष अर्हता वा इतर कोणत्याही बाबतीत प्राधान्य नमूद असल्यास त्यासाठी द्यावयाचे गुण.

**(३.२.६)** यानंतर निवड समिती एकूण गुण लक्षात घेऊन गुणांच्या उतरत्या क्रमाने उमेव्दारांची यादी तयार करील व ती आयुक्तांकडे गोपनीयरित्या बंद लिफाफ्यात सादर करील.

**(३.२.७)** भरती प्रक्रियेसाठी सामान्य प्रशासन विभागाने वेळोवेळी दिलेले निर्देश लागू राहतील.

**४. <u>पदोन्नतीने नेमणूकीकरीता कार्यपध्दती:-</u>**

**(४.१)** सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.एसआरव्ही-२०१८/ प्र.क्र.१५९/ का.१२, दिनांक ०१ ऑगस्ट, २०१९ मध्ये तसेच वेळोवेळी शासनाच्या प्रचलित निर्णयान्वये दिलेल्या निर्देशाप्रमाणे दरवर्षी पदोन्नतीची प्रक्रिया विहीत कालमर्यादेत पूर्ण होण्यासाठी वेळापत्रकाचे काटेकोरपणे पालन करणे बंधनकारक राहील.

**(४.२)** प्रत्येक वर्षी १ सप्टेंबर ते ३१ ऑगस्ट या कालावधीत प्रत्येक संवर्गात पदोन्नतीने किती पदे भरावी लागणार आहेत, याचा आढावा सामान्य प्रशासन विभागातर्फे जून महिन्यात आयुक्तांना सादर करावा.

**(४.३)** उपरोक्त शासन परिपत्रकानुसार कार्यवाही करताना, पदोन्नतीने भरावयाच्या पदांची संख्या निश्चित झाल्यावर आवश्यक अर्हता धारण करणाऱ्या कर्मचाऱ्यांमधून जेष्ठतानुक्रमाने पदांच्या संख्येच्या तिप्पट (१:३) कर्मचाऱ्यांचा पदोन्नतीच्या विचारक्षेत्रात (Zone of Consideration) समावेश करण्यात येईल.

**(४.४)** विभागीय चौकशी सुरु असलेल्या तसेच निलंबित असलेल्या अधिकारी/ कर्मचाऱ्याची नावे जेष्ठतानुक्रमाने यादीत येत असल्यास, त्यांची नावे यादीतून वगळण्यात येऊ नयेत. त्यांच्या नावाचा विचार केल्यावर निवड समितीचा अभिप्राय त्यांच्या नावासमोर नोंदविण्यात येईल.

**(४.५)** पदोन्नतीसाठी पात्र ठरलेल्या कर्मचाऱ्यांचा निवडसूचीत जेष्ठतेनुसार समावेश करण्यात येईल.

**(४.६)** निवड समिती कर्मचाऱ्यांचे मागील ५ वर्षांचे गोपनीय अहवाल आणि त्यांचेपुढे ठेवलेली इतर कागदपत्रे यांचे अवलोकन करून कर्मचाऱ्यांच्या पदोन्नतीच्या योग्यतेबद्दल निर्णय घेईल. मात्र असा निर्णय एकमताने झाला नाही, तर त्याबद्दलचा अंतिम निर्णय समिती प्रमुखाचा असेल.

**(४.७)** कर्मचाऱ्यांच्या निवडीसंबंधी अंतिम निर्णय घेण्यापूर्वी अधिक माहितीची आवश्यकता वाटल्यास अशी माहिती मागविण्याचा समितीस अधिकार असेल.

**५.** वरील (३) व (४) नुसार निवड समितीने केलेली शिफारस महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम, १९४९ च्या कलम-५३ (१), ५३(२) वा ५३ (३) नुसार संबंधित सक्षम नियुक्ती प्राधिकाऱ्याकडे मान्यतेसाठी ठेवली जाईल.

**६.** तयार करण्यात आलेली निवडसूची त्या-त्या निवडसूचीच्या वर्षासाठी वैध असेल.

**७.** समिती सचिव बैठकीचा कार्यवृत्तांत तयार करून त्यास समितीची मान्यता घेण्यास जबाबदार असेल. सदस्यांना सादर केलेली सर्व कागदपत्रे परत घेऊन ती एकत्रित जतन करण्याची जबाबदारी समिती सचिवाची असेल.

**८.** गट-क व गट -ड मध्ये सेवा भरती करताना सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक क्र. न्याप्र-१००३/९९/प्र.क्र.२/०३ (भाग-२) /१६ अ, दिनांक २५ ऑक्टोबर, २००५ अन्वये एकत्रित मार्गदर्शक तत्वांचा लागू असेल तेथे अवलंब करण्यात यावा. या मार्गदर्शक तत्वांमध्ये वेळोवेळी होणारे बदलही अंमलात आणण्यात यावेत.

**९.** गट-क व गट-ड मधील अनुकंपाच्या भरावयाच्या पदांसाठी आयुक्तांच्या शिफारशीने व शासन मान्यतेने अधिसंख्य पदे निर्माण करता येतील.

**१०. पदोन्नतीसाठी निवड समितीची रचना खालीलप्रमाणे असेल:-**

| | |
|---|---|
| (१) आयुक्त किंवा आयुक्तांनी पदनिर्देशित केलेला अन्य कोणताही अधिकारी | - अध्यक्ष |
| (२) मुख्य लेखापरीक्षक | - सदस्य |
| (३) संबंधित विभाग प्रमुख | - सदस्य |
| (४) आयुक्तांनी नामनिर्देशित केलेला मागासवर्गीय प्रवर्गातील अधिकारी | -सदस्य |
| (५) उपआयुक्त (सामान्य प्रशासन) | -सदस्य सचिव व निमंत्रक |

Digitally signed by ANIRUDDHA V JEWLIKAR
Date: 2023.05.02 17:10:57 +05'30'

**( अनिरुध्द व्यं. जेवळीकर )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**इचलकरंजी महानगरपालिका**

**परिशिष्ट-(२)**

**महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम, १९४९ च्या कलम ३६, कलम ३९ (अ), कलम ४५ व कलम ५३ (१) मधील तरतुदीनुसार नेमणूक करावयाच्या पदांसाठीची कलम ४५ (३) व कलम-४५७ (३) अन्वये विहित शैक्षणिक व इतर अर्हता**

**( पहा नियम - ३)**

| अ.क्र. | पदनाम व श्रेणी | नेमणुकीची पद्धत व टक्केवारी (नामनिर्देशन/ पदोन्नती/प्रतिनियुक्ती) | नेमणुकीकरिता अर्हता व नेमणुकीच्या पद्धती |
|---|---|---|---|
| | | **१. सामान्य प्रशासन विभाग** | |
| १ | **आयुक्त** (गट- अ, प्रशासकीय सेवा) | प्रतिनियुक्ती १००% | राज्य शासनाकडून वेळोवेळी नेमणूक करण्यात येईल, असा अधिकारी (महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम, १९४९ च्या कलम ३६ प्रमाणे) |
| २ | **अतिरिक्त आयुक्त** (गट- अ, प्रशासकीय सेवा) | प्रतिनियुक्ती १००% | महाराष्ट्र शासन, नगर विकास विभागाकडील शासन निर्णय क्रमांक एमसीओ २०१४/प्र.क्र.२१८/नवि १४ दिनांक ६ जानेवारी २०१५ व शासन निर्णय क्र. एमसीओ-२०२१/प्र.क्र.१९१/नवि-१४ दि.२२/०२/२०२२ नुसार महाराष्ट्र शहरी प्रशासकीय सेवा / मुख्याधिकारी सेवेतील समकक्ष पदावरील अधिकाऱ्याची महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम, १९४९ च्या कलम ३९ अ नुसार शासनाकडून वेळोवेळी नेमणूक करण्यात येईल. |
| ३ | **उप आयुक्त** (गट- अ, प्रशासकीय सेवा) | पदोन्नती-५०% | इचलकरंजी महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील सहायक आयुक्त या पदावर किमान ३ वर्षांची नियमित सेवा पूर्ण झालेल्या अधिकाऱ्याची सेवाज्येष्ठता व गुणवत्तेच्या आधारे पदोन्नतीने नियुक्ती करता येईल. (महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम, १९४९ कलम ४५ (२) नुसार महानगरपालिका व शासन मान्यता आवश्यक) |
| | | प्रतिनियुक्ती-५०% | महाराष्ट्र शासन, नगर विकास विभाग अधिसूचना क्र.एमसीओ-२०२१/प्र.क्र.१८२/नवि-१४ दि.१ नोव्हेंबर २०२१ व शासन निर्णय क्र. एमसीओ-२०२१/प्र.क्र.१९१/नवि-१४ दि.२२/०२/२०२२ नुसार महाराष्ट्र शहरी प्रशासकीय सेवा / मुख्याधिकारी सेवेतील श्रेणी अ मधील अधिकाऱ्याची शासनाकडून प्रतिनियुक्तीने नियुक्ती करता येईल. |
| ४ | **सहायक आयुक्त** (गट- ब, प्रशासकीय सेवा) | पदोन्नती-५०% | इचलकरंजी महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील अधीक्षक या पदावर किमान ३ वर्षांची नियमित सेवा पूर्ण झालेल्या व मान्यताप्राप्त विद्यापीठाची पदवी धारण करणाऱ्या अधिकाऱ्याची सेवाज्येष्ठता व गुणवत्तेच्या आधारे पदोन्नतीने नियुक्ती करता येईल. |

| अ.क्र. | पदनाम व श्रेणी | नेमणुकीची पद्धत व टक्केवारी (नामनिर्देशन/ पदोन्नती/प्रतिनियुक्ती) | नेमणुकीकरिता अर्हता व नेमणुकीच्या पद्धती |
|---|---|---|---|
| | | प्रतिनियुक्ती-५०% | महाराष्ट्र शासन, नगर विकास विभाग अधिसूचना क्र.एमसीओ-२०२१/प्र.क्र.१८२/नवि-१४ दि.१ नोव्हेंबर २०२१ व शासन निर्णय क्र. एमसीओ-२०२१/प्र.क्र.१९१/नवि-१४ दि.२२/०२/२०२२ नुसार महाराष्ट्र शहरी प्रशासकीय सेवा / मुख्याधिकारी सेवेतील श्रेणी ब मधील अधिकाऱ्याची शासनाकडून प्रतिनियुक्तीने नियुक्ती करता येईल. |
| ५ | **मुल्य निर्धारक कर संकलन अधिकारी** (गट- अ, प्रशासकीय सेवा) | पदोन्नती १०० % | अ) इचलकरंजी महानगरपालिका आस्थापनेवरील सहायक मुल्य निर्धारण कर संकलन अधिकारी पदावरील किमान ५ वर्षे नियमित सेवा.<br>ब) पदोन्नतीने अधिकारी उपलब्ध होत नसल्यास,<br>महाराष्ट्र शासन, नगर विकास विभाग अधिसूचना क्र.एमसीओ-२०२१/प्र.क्र.१८२/नवि-१४ दि.१ नोव्हेंबर २०२१ व शासन निर्णय क्र. एमसीओ-२०२१/ प्र.क्र.१९१/नवि-१४ दि.२२/०२/२०२२ नुसार महाराष्ट्र शहरी प्रशासकीय सेवा / मुख्याधिकारी सेवेतील समकक्ष पदावरील अधिकाऱ्याची शासनाकडून प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्यात येईल. |
| ६ | **सहाय्यक मुल्यनिर्धारण कर संकलन अधिकारी** (गट- ब, प्रशासकीय सेवा) | पदोन्नती १०० % | अ) इचलकरंजी महानगरपालिकेच्या अधीक्षक पदावरील किमान ३ वर्षांची नियमित सेवा<br>ब) पदोन्नतीने कर्मचारी उपलब्ध नसल्यास,<br>महाराष्ट्र शासन, नगर विकास विभागाकडील शासन निर्णय क्र. एमसीओ-२०२१/प्र.क्र.१९१/नवि-१४ दि.२२/०२/२०२२ नुसार महाराष्ट्र शहरी प्रशासकीय सेवा / मुख्याधिकारी सेवेतील समकक्ष पदावरील अधिकाऱ्याची शासनाकडून प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्यात येईल. |
| ७ | **कामगार अधिकारी** (गट- ब, प्रशासकीय सेवा) | पदोन्नती १०० % | अ) डिप्लोमा इन लेबर लॉ<br>ब) इचलकरंजी महानगरपालिका आस्थापनेवरील अधीक्षक पदावर ३ वर्षाची नियमित सेवा<br>क) वरीलप्रमाणे अधिकारी उपलब्ध न झाल्यास इचलकरंजी महानगरपालिकेतील गट क मधील ३ वर्ष नियमित सेवा पुर्ण झालेल्या व डिप्लोमा इन लेबर लॉ ही अर्हता धारण करणाऱ्या कर्मचाऱ्यांमधुन सेवाजेष्ठतेने नियुक्ती करता येईल. |
| | | | पदोन्नतीने अधिकारी उपलब्ध न झाल्यास नामनिर्देशनाव्दारे उपलब्ध करण्यात येईल<br>अ) मान्यताप्राप्त विद्यापिठाची विधी शाखेची पदवी.<br>पदव्युत्तर पदवी धारकास प्राधान्य |

| अ.क्र. | पदनाम व श्रेणी | नेमणुकीची पद्धत व टक्केवारी (नामनिर्देशन/ पदोन्नती/प्रतिनियुक्ती) | नेमणुकीकरिता अर्हता व नेमणुकीच्या पद्धती |
|---|---|---|---|
| | | | ब) शासकीय / निमशासकीय/स्थानिक स्वराज्य संस्थेकडील पर्यवेक्षकीय पदावरील किमान ०५ वर्षाचा अनुभव |
| ८ | **अधीक्षक**<br>(गट-क, प्रशासकीय सेवा) | पदोन्नती १०० % | अ) शासनमान्य विद्यापीठाची कोणत्याही शाखेची पदवी<br>ब)इचलकरंजी महानगरपालिका आस्थापनेवरील वरिष्ठ लिपीक / स्टोअर किपर संवर्गातील पदावरील किमान ०३ वर्षाची नियमित सेवा.<br>क) विभागीय परीक्षा उत्तीर्ण असणे आवश्यक |
| ९ | **निम्नश्रेणी लघुलेखक (मराठी/इंग्रजी)**<br>(गट-क, स्वीय सेवा) | पदोन्नती ५० % | इचलकरंजी महानगरपालिका आस्थापनेवरील लघु-टंकलेखक या पदावरील किमान ३ वर्षाची नियमित सेवा |
| | | नामनिर्देशन ५०% | अ) शासनमान्य विद्यापिठाची कोणत्याही शाखेची पदवी<br>ब) राज्य शासनाची इंग्रजी व मराठी लघुलेखनाची १०० श.प्र.मि. वेगाची परीक्षा उत्तीर्ण<br>क) मराठी व इंग्रजी ४० श.प्र.मि. वेगाची टंकलेखनाची अर्हता आवश्यक<br>ड) महाराष्ट्र राज्य उच्च व तंत्र शिक्षण मंडळ, मुंबई यांचेकडील अधिकृत MS-CIT परीक्षा उत्तीर्ण अथवा समकक्ष असलेली एक शासनमान्य परीक्षा उत्तीर्ण झाल्याचे प्रमाणपत्र |
| १० | **लघुटंकलेखक (मराठी/इंग्रजी)**<br>(गट-क, स्वीय सेवा) | नामनिर्देशन १००% | अ) मान्यताप्राप्त विद्यापीठाची कोणत्याही शाखेची पदवी<br>ब) मराठी व इंग्रजी लघुलेखनाची ८० श. प्र. मि. वेगाची परीक्षा उत्तीर्ण<br>क) मराठी ३० श. प्र. मि. इंग्रजी ४० श. प्र.मि. वेगाची टंकलेखनाची अर्हता आवश्यक<br>ड) महाराष्ट्र राज्य उच्च व तंत्र शिक्षण मंडळ, मुंबई यांचेकडील अधिकृत MS-CIT परीक्षा उत्तीर्ण अथवा समकक्ष असलेली एक शासनमान्य परीक्षा उत्तीर्ण झाल्याचे प्रमाणपत्र |
| ११ | **वरिष्ठ लिपिक**<br>(गट-क, प्रशासकीय सेवा) | पदोन्नती १०० % | अ) इचलकरंजी महानगरपालिका आस्थापनेवरील लिपीक-टंकलेखक / वॉर्ड इन्स्पेक्टर / रोखपाल / स्वीय सहाय्यक या पदावरील किमान ०३ वर्षाची नियमित सेवा<br>ब) मान्यताप्राप्त विद्यापीठाची कोणत्याही शाखेची पदवी (हे सेवा प्रवेश नियम निर्गमित झाल्याच्या दिनांकास लिपीक-टंकलेखक / वॉर्ड इन्स्पेक्टर / रोखपाल / स्वीय सहाय्यक या पदावर कार्यरत असलेल्या कर्मचाऱ्यांना सदरची अट लागू राहणार नाही. मात्र त्यांना उच्च माध्यमिक शालांत परीक्षा |

| अ.क्र. | पदनाम व श्रेणी | नेमणुकीची पद्धत व टक्केवारी (नामनिर्देशन/ पदोन्नती/प्रतिनियुक्ती) | नेमणुकीकरिता अर्हता व नेमणुकीच्या पद्धती |
|---|---|---|---|
| | | | उत्तीर्ण असणे आवश्यक.)<br>क) राज्य शासनाची मराठी टंकलेखन ३० श.प्र.मि./ इंग्रजी टंकलेखन ४० श. प्र. मि. वेगाची परीक्षा उत्तीर्ण असणे आवश्यक.<br>ड)विभागीय परीक्षा उत्तीर्ण असणे आवश्यक. |
| १२ | **स्टोअर किपर**<br>(गट-क, प्रशासकीय सेवा) | पदोन्नती १०० % | अ) इचलकरंजी महानगरपालिका आस्थापनेवरील लिपीक-टंकलेखक या पदावरील किमान ०३ वर्षाची नियमित सेवा<br>ब) मान्यताप्राप्त विद्यापिठाची कोणत्याही शाखेची पदवी (हे सेवा प्रवेश नियम निर्गमित झाल्याच्या दिनांकास लिपीक-टंकलेखक या पदावर कार्यरत असलेल्या कर्मचाऱ्यांना सदरची अट लागू राहणार नाही. मात्र त्यांना उच्च माध्यमिक शालांत परीक्षा उत्तीर्ण असणे आवश्यक. )<br>क) राज्य शासनाची मराठी टंकलेखन ३० श.प्र.मि./ इंग्रजी टंकलेखन ४० श. प्र. मि. वेगाची परीक्षा उत्तीर्ण असणे आवश्यक.<br>ड)विभागीय परीक्षा उत्तीर्ण असणे आवश्यक. |
| १३ | **लिपिक-टंकलेखक**<br>(गट-क, प्रशासकीय सेवा) | नामनिर्देशन ५०% | अ) मान्यताप्राप्त विद्यापिठाची कोणत्याही शाखेची पदवी<br>ब) राज्य शासनाची मराठी टंकलेखन ३० श.प्र.मि./ इंग्रजी टंकलेखन ४० श. प्र. मि. वेगाची परीक्षा उत्तीर्ण असणे आवश्यक<br>क) महाराष्ट्र राज्य उच्च व तंत्र शिक्षण मंडळ, मुंबई यांचेकडील अधिकृत MS-CIT परीक्षा उत्तीर्ण अथवा समकक्ष असलेली एक शासनमान्य परीक्षा उत्तीर्ण झाल्याचे प्रमाणपत्र<br>ड) मराठी भाषेचे ज्ञान आवश्यक |
| | | पदोन्नती ५०% | अ) इचलकरंजी महानगरपालिका आस्थापनेवरील चतुर्थ श्रेणीतील ०५ वर्ष नियमित सेवा झालेला कर्मचारी<br>ब) उच्च माध्यमिक शिक्षण मंडळाची उच्च माध्यमिक शालांत प्रमाणपत्र परीक्षा (H.S.C.) उत्तीर्ण.<br>(हे सेवा प्रवेश नियम निर्गमित झाल्याच्या दिनांकास चतुर्थ श्रेणी कर्मचारी म्हणून इचलकरंजी महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील कर्मचाऱ्यांना सदरची अट लागू राहील. मात्र त्यानंतर नियुक्त होणाऱ्या चतुर्थ श्रेणी कर्मचारी यांना पदोन्नतीसाठी मान्यताप्राप्त विद्यापीठाची कोणत्याही शाखेची |

| अ.क्र. | पदनाम व श्रेणी | नेमणुकीची पद्धत व टक्केवारी (नामनिर्देशन/ पदोन्नती/प्रतिनियुक्ती) | नेमणुकीकरिता अर्हता व नेमणुकीच्या पद्धती |
|---|---|---|---|
| | | | पदवी अशी अट लागू राहील.)<br>क) राज्य शासनाची मराठी टंकलेखन ३० श. प्र. मि. / इंग्रजी टंकलेखन ४० श. प्र. मि. वेगाची परीक्षा उत्तीर्ण असणे आवश्यक<br>ड) महाराष्ट्र राज्य उच्च व तंत्र शिक्षण मंडळ, मुंबई यांचेकडील अधिकृत MS-CIT परीक्षा उत्तीर्ण अथवा समकक्ष असलेली एक शासनमान्य परीक्षा उत्तीर्ण झाल्याचे प्रमाणपत्र |
| १४ | वॉर्ड इन्स्पेक्टर<br>(गट क प्रशासकीय सेवा) | नामनिर्देशन ५०% | अ) मान्यताप्राप्त विद्यापिठाची कोणत्याही शाखेची पदवी<br>ब) राज्य शासनाची मराठी टंकलेखन ३० श.प्र.मि./ इंग्रजी टंकलेखन ४० श. प्र. मि. वेगाची परीक्षा उत्तीर्ण असणे आवश्यक<br>क) महाराष्ट्र राज्य उच्च व तंत्र शिक्षण मंडळ, मुंबई यांचेकडील अधिकृत MS-CIT परीक्षा उत्तीर्ण अथवा समकक्ष असलेली एक शासनमान्य परीक्षा उत्तीर्ण झाल्याचे प्रमाणपत्र<br>ड) मराठी भाषेचे ज्ञान आवश्यक |
| | | पदोन्नती ५०% | अ) इचलकरंजी महानगरपालिका आस्थापनेवरील चतुर्थ श्रेणीतील पदावर ०५ वर्ष नियमित सेवा झालेला कर्मचारी<br>ब) उच्च माध्यमिक शिक्षण मंडळाची उच्च माध्यमिक शालांत प्रमाणपत्र परीक्षा (H.S.C.) उत्तीर्ण.<br>(हे सेवा प्रवेश नियम निर्गमित झाल्याच्या दिनांकास चतुर्थ श्रेणी कर्मचारी म्हणून इचलकरंजी महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील कर्मचाऱ्यांना सदरची अट लागू राहील. मात्र त्यानंतर नियुक्त होणाऱ्या चतुर्थ श्रेणी कर्मचारी यांना पदोन्नतीसाठी मान्यताप्राप्त विद्यापीठाची कोणत्याही शाखेची पदवी अशी अट लागू राहील.)<br>क) राज्य शासनाची मराठी टंकलेखन ३० श. प्र. मि. / इंग्रजी टंकलेखन ४० श. प्र. मि. वेगाची परीक्षा उत्तीर्ण असणे आवश्यक<br>ड) महाराष्ट्र राज्य उच्च व तंत्र शिक्षण मंडळ, मुंबई यांचेकडील अधिकृत MS-CIT परीक्षा उत्तीर्ण अथवा समकक्ष असलेली एक शासनमान्य परीक्षा उत्तीर्ण झाल्याचे प्रमाणपत्र |
| १५ | सी.सी.टी.व्ही. ऑपरेटर<br>(गट क प्रशासकीय सेवा) | नामनिर्देशन १००% | अ) मान्यताप्राप्त विद्यापिठाची कोणत्याही शाखेची पदवी<br>ब) महाराष्ट्र राज्य उच्च व तंत्र शिक्षण मंडळ, मुंबई यांचेकडील अधिकृत MS-CIT परीक्षा उत्तीर्ण |

| अ.क्र. | पदनाम व श्रेणी | नेमणुकीची पद्धत व टक्केवारी (नामनिर्देशन/ पदोन्नती/प्रतिनियुक्ती) | नेमणुकीकरिता अर्हता व नेमणुकीच्या पद्धती |
|---|---|---|---|
| | | | अथवा समकक्ष असलेली एक शासन मान्य परीक्षा उत्तीर्ण झाल्याचे प्रमाणपत्र<br>क) मराठी भाषेचे ज्ञान आवश्यक |
| १६ | रोखपाल<br>(गट क प्रशासकीय सेवा) | नामनिर्देशन ५०% | अ) मान्यताप्राप्त विद्यापिठाची कोणत्याही शाखेची पदवी<br>ब) राज्य शासनाची मराठी टंकलेखन ३० श.प्र.मि./ इंग्रजी टंकलेखन ४० श. प्र. मि. वेगाची परीक्षा उत्तीर्ण असणे आवश्यक<br>क) महाराष्ट्र राज्य उच्च व तंत्र शिक्षण मंडळ, मुंबई यांचेकडील अधिकृत MS-CIT परीक्षा उत्तीर्ण अथवा समकक्ष असलेली एक शासनमान्य परीक्षा उत्तीर्ण झाल्याचे प्रमाणपत्र<br>ड) मराठी भाषेचे ज्ञान आवश्यक |
| | | पदोन्नती ५०% | अ) इचलकरंजी महानगरपालिका आस्थापनेवरील चतुर्थ श्रेणीतील ०५ वर्ष नियमित सेवा झालेला कर्मचारी<br>ब) उच्च माध्यमिक शिक्षण मंडळाची उच्च माध्यमिक शालांत प्रमाणपत्र परीक्षा (H.S.C.) उत्तीर्ण.<br>(हे सेवा प्रवेश नियम निर्गमित झाल्याच्या दिनांकास चतुर्थ श्रेणी कर्मचारी म्हणून इचलकरंजी महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील कर्मचाऱ्यांना सदरची अट लागू राहील. मात्र त्यानंतर नियुक्त होणाऱ्या चतुर्थ श्रेणी कर्मचारी यांना पदोन्नतीसाठी मान्यताप्राप्त विद्यापीठाची कोणत्याही शाखेची पदवी अशी अट लागू राहील.)<br>क) राज्य शासनाची मराठी टंकलेखन ३० श. प्र. मि. / इंग्रजी टंकलेखन ४० श. प्र. मि. वेगाची परीक्षा उत्तीर्ण असणे आवश्यक<br>ड) महाराष्ट्र राज्य उच्च व तंत्र शिक्षण मंडळ, मुंबई यांचेकडील अधिकृत MS-CIT परीक्षा उत्तीर्ण अथवा समकक्ष असलेली एक शासनमान्य परीक्षा उत्तीर्ण झाल्याचे प्रमाणपत्र |
| १७ | स्वीय सहाय्यक<br>(गट क प्रशासकीय सेवा) | नामनिर्देशन ५०% | अ) मान्यताप्राप्त विद्यापिठाची कोणत्याही शाखेची पदवी<br>ब) राज्य शासनाची मराठी टंकलेखन ३० श.प्र.मि./ इंग्रजी टंकलेखन ४० श. प्र. मि. वेगाची परीक्षा उत्तीर्ण असणे आवश्यक<br>क) महाराष्ट्र राज्य उच्च व तंत्र शिक्षण मंडळ, मुंबई यांचेकडील अधिकृत MS-CIT परीक्षा उत्तीर्ण अथवा समकक्ष असलेली एक शासनमान्य परीक्षा उत्तीर्ण झाल्याचे प्रमाणपत्र |

| अ.क्र. | पदनाम व श्रेणी | नेमणुकीची पद्धत व टक्केवारी (नामनिर्देशन/ पदोन्नती/प्रतिनियुक्ती) | नेमणुकीकरिता अर्हता व नेमणुकीच्या पद्धती |
|---|---|---|---|
| | | | ड) मराठी भाषेचे ज्ञान आवश्यक |
| | | पदोन्नती ५०% | अ) इचलकरंजी महानगरपालिका आस्थापनेवरील चतुर्थ श्रेणीतील ०५ वर्ष नियमित सेवा झालेला कर्मचारी<br>ब) उच्च माध्यमिक शिक्षण मंडळाची उच्च माध्यमिक शालांत प्रमाणपत्र परीक्षा (H.S.C.) उत्तीर्ण.<br>(हे सेवा प्रवेश नियम निर्गमित झाल्याच्या दिनांकास चतुर्थ श्रेणी कर्मचारी म्हणून इचलकरंजी महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील कर्मचाऱ्यांना सदरची अट लागू राहील. मात्र त्यानंतर नियुक्त होणाऱ्या चतुर्थ श्रेणी कर्मचारी यांना पदोन्नतीसाठी मान्यताप्राप्त विद्यापीठाची कोणत्याही शाखेची पदवी अशी अट लागू राहील.)<br>क) राज्य शासनाची मराठी टंकलेखन ३० श. प्र. मि. / इंग्रजी टंकलेखन ४० श. प्र. मि. वेगाची परीक्षा उत्तीर्ण असणे आवश्यक<br>ड) महाराष्ट्र राज्य उच्च व तंत्र शिक्षण मंडळ, मुंबई यांचेकडील अधिकृत MS-CIT परीक्षा उत्तीर्ण अथवा समकक्ष असलेली एक शासन मान्य परीक्षा उत्तीर्ण झाल्याचे प्रमाणपत्र |
| १८ | **दूरध्वनी चालक**<br>(गट-क, तांत्रिक सेवा) | नामनिर्देशन १००% | अ) उच्च माध्यमिक शिक्षण मंडळाची उच्च माध्यमिक शालांत प्रमाणपत्र परीक्षा (H.S.C.) उत्तीर्ण.<br>ब) शासकीय अथवा शासन मान्य औद्योगिक प्रशिक्षण संस्थेचा टेलिफोन ऑपरेटरचा अभ्यासक्रम पूर्ण.<br>क) मराठी व हिंदीमध्ये संभाषण करता येणे आवश्यक |
| १९ | **हवालदार नाईक**<br>(गट-ड, प्रशासकीय सेवा) | पदोन्नती १०० % | अ) इचलकरंजी महानगरपालिकेच्या शिपाई पदावरील ५ वर्षाची नियमित सेवा पुर्ण केलेल्या कर्मचाऱ्याची सेवाजेष्ठता व गुणवत्तेनुसार पदोन्नतीने नियुक्ती करता येईल.<br>ब) मराठी भाषेचे ज्ञान आवश्यक |
| २० | **शिपाई**<br>(गट-ड, प्रशासकीय सेवा) | नामनिर्देशन/ सरळसेवा- १००% | अ) महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळाची माध्यमिक शालांत प्रमाणपत्र (S.S.C.) परीक्षा उत्तीर्ण.<br>ब) मराठी भाषेचे ज्ञान आवश्यक. |

| **अ.क्र.** | **पदनाम व श्रेणी** | **नेमणुकीची पद्धत व टक्केवारी (नामनिर्देशन/ पदोन्नती/प्रतिनियुक्ती)** | **नेमणुकीकरिता अर्हता व नेमणुकीच्या पद्धती** |
|---|---|---|---|
| | | | **२. अभियांत्रिकी विभाग** |
| २१ | **शहर अभियंता (स्थापत्य)** (गट-अ, अभियांत्रिकी सेवा) | पदोन्नती १०० % | अ) इचलकरंजी महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील कार्यकारी अभियंता (स्थापत्य)/ उपअभियंता (स्थापत्य) या पदावर किमान ३ वर्षे नियमित सेवा पुर्ण झालेल्या कर्मचाऱ्याची सेवाजेष्ठता व गुणवत्तेच्या आधारे पदोन्नतीने नियुक्ती करता येईल.<br>ब) महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम, १९४९ मधील कलम ४५ (२) नुसार महानगरपालिका व शासन मान्यता आवश्यक<br>पदोन्नतीने अधिकारी उपलब्ध न झाल्यास पदोन्नतीने अधिकारी उपलब्ध होईतोपर्यंत राज्य शासनाकडून समकक्ष पदावर कार्यरत असलेल्या अधिकाऱ्याची प्रतिनियुक्तीने नियुक्ती करता येईल |
| २२ | **कार्यकारी अभियंता (स्थापत्य) /** (गट-अ, अभियांत्रिकी सेवा) | पदोन्नती १००% | अ) इचलकरंजी महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील उपअभियंता (स्थापत्य) या पदावर किमान ०३ वर्ष नियमित सेवा पुर्ण<br>ब) पदोन्नतीने अधिकारी उपलब्ध न झाल्यास पदोन्नतीने अधिकारी उपलब्ध होईपर्यंत राज्य शासनाकडून समकक्ष पदावर कार्यरत असलेल्या अधिकाऱ्याची प्रतिनियुक्तीने नियुक्ती करता येईल |
| २३ | **कार्यकारी अभियंता (पाणीपुरवठा)** (गट-अ, अभियांत्रिकी सेवा) | पदोन्नती १००% | अ) इचलकरंजी महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील उपअभियंता (स्थापत्य) या पदावर किमान ०३ वर्ष नियमित सेवा पुर्ण<br>ब) पदोन्नतीने अधिकारी उपलब्ध न झाल्यास पदोन्नतीने अधिकारी उपलब्ध होईपर्यंत राज्य शासनाकडून समकक्ष पदावर कार्यरत असलेल्या अधिकाऱ्याची प्रतिनियुक्तीने नियुक्ती करता येईल |
| २४ | **उपअभियंता (स्थापत्य)** / (गट-अ, अभियांत्रिकी सेवा) | पदोन्नती १००% | इचलकरंजी महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील कनिष्ठ अभियंता (स्थापत्य) /पाणी पुरवठा या पदावर किमान ०३ वर्ष नियमित सेवा पुर्ण केलेल्या अधिकाऱ्याची सेवाजेष्ठता व गुणवत्तेनुसार पदोन्नतीने नियुक्ती करता येईल. |
| २५ | **उपअभियंता (यांत्रिकी)** (गट-अ, अभियांत्रिकी सेवा) | पदोन्नती १००% | इचलकरंजी महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील शाखा अभियंता/ कनिष्ठ अभियंता (यांत्रिकी) या पदावर किमान ०३ वर्षाची सेवा पुर्ण झालेल्या अधिकाऱ्याची सेवा जेष्ठता व गुणवत्तेच्या आधारे पदोन्नतीने नियुक्ती करता येईल. |

| अ.क्र. | पदनाम व श्रेणी | नेमणुकीची पद्धत व टक्केवारी (नामनिर्देशन/ पदोन्नती/प्रतिनियुक्ती) | नेमणुकीकरिता अर्हता व नेमणुकीच्या पद्धती |
|---|---|---|---|
| २६ | **उपअभियंता (विद्युत)**<br>(गट-अ, अभियांत्रिकी सेवा) | पदोन्नती १००% | इचलकरंजी महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील शाखा अभियंता/ कनिष्ठ अभियंता (विद्युत) या पदावर किमान ०३ वर्षाची सेवा पुर्ण झालेल्या अधिकाऱ्याची सेवा जेष्ठता व गुणवत्तेच्या आधारे पदोन्नतीने नियुक्ती करता येईल. |
| २७ | **शाखा अभियंता / कनिष्ठ अभियंता (स्थापत्य)/ पाणी पुरवठा**<br>(गट-ब, अभियांत्रिकी सेवा) | नामनिर्देशन १००% | अ)मान्यताप्राप्त विद्यापीठाची स्थापत्य अभियांत्रिकी शाखेची पदवी<br>ब)स्थापत्य अभियांत्रिकी शाखेतील पदव्युत्तर पदवी परीक्षा उत्तीर्ण असल्यास प्राधान्य<br>क) नेमणूकीनंतर ३ वर्षात कनिष्ठ अभियंता व्यावसायिक परीक्षा उत्तीर्ण होणे अनिवार्य आहे.<br>ड) महाराष्ट्र राज्य उच्च व तंत्र शिक्षण मंडळ, मुंबई यांचेकडील अधिकृत MS-CIT परीक्षा उत्तीर्ण अथवा समकक्ष असलेली एक शासन मान्य परीक्षा उत्तीर्ण झाल्याचे प्रमाणपत्र<br>इ) मराठी भाषेचे ज्ञान आवश्यक |
| २८ | **शाखा अभियंता / कनिष्ठ अभियंता (विद्युत)**<br>(गट-ब, अभियांत्रिकी सेवा) | नामनिर्देशन १००% | अ) मान्यताप्राप्त विद्यापीठाची विद्युत अभियांत्रिकी शाखेची पदवी परीक्षा उत्तीर्ण<br>ब) विद्युत अभियांत्रिकी शाखेतील पदव्युत्तर पदवी परीक्षा उत्तीर्ण असल्यास प्राधान्य<br>क) अनुभव धारकास प्राधान्य<br>ड) महाराष्ट्र राज्य उच्च व तंत्र शिक्षण मंडळ, मुंबई यांचेकडील अधिकृत MS-CIT परीक्षा उत्तीर्ण अथवा समकक्ष असलेली एक शासन मान्य परीक्षा उत्तीर्ण झाल्याचे प्रमाणपत्र<br>इ) मराठी भाषेचे ज्ञान आवश्यक |
| २९ | **शाखा अभियंता / कनिष्ठ अभियंता (यांत्रिकी)**<br>(गट-ब, अभियांत्रिकी सेवा) | नामनिर्देशन १००% | अ) मान्यताप्राप्त विद्यापीठाची यांत्रिकी अभियांत्रिकी शाखेची पदवी परीक्षा उत्तीर्ण<br>ब) यांत्रिकी अभियांत्रिकी शाखेतील पदव्युत्तर पदवी परीक्षा उत्तीर्ण असल्यास प्राधान्य<br>क) अनुभव धारकास प्राधान्य<br>ड) महाराष्ट्र राज्य उच्च व तंत्र शिक्षण मंडळ, मुंबई यांचेकडील अधिकृत MS-CIT परीक्षा उत्तीर्ण अथवा समकक्ष असलेली एक शासन मान्य परीक्षा उत्तीर्ण झाल्याचे प्रमाणपत्र<br>इ) मराठी भाषेचे ज्ञान आवश्यक |
| ३० | **वाहन अधीक्षक**<br>(गट-क, अभियांत्रिकी सेवा) | नामनिर्देशन १००% | अ) मान्यताप्राप्त विद्यापीठाची यांत्रिकी अभियांत्रिकी (Mechanical Engg.)किंवा ऑटोमोबाईल इंजिनियरिंग पदवी परीक्षा उत्तीर्ण |

| अ.क्र. | पदनाम व श्रेणी | नेमणुकीची पद्धत व टक्केवारी (नामनिर्देशन/ पदोन्नती/प्रतिनियुक्ती) | नेमणुकीकरिता अर्हता व नेमणुकीच्या पद्धती |
|---|---|---|---|
| | | | ब) अनुभव धारकास प्राधान्य<br>क) महाराष्ट्र राज्य उच्च व तंत्र शिक्षण मंडळ, मुंबई यांचेकडील अधिकृत MS-CIT परीक्षा उत्तीर्ण अथवा समकक्ष असलेली एक शासन मान्य परीक्षा उत्तीर्ण झाल्याचे प्रमाणपत्र<br>ड) मराठी भाषेचे ज्ञान आवश्यक |
| ३१ | **आरेखक (ड्राफ्ट्समन)**<br>(गट-क, तांत्रिक सेवा) | नामनिर्देशन १००% | अ) उच्च माध्यमिक (HSC) शिक्षण मंडळाची परीक्षा उत्तीर्ण<br>ब) शासनमान्य संस्थेमधील ॲटोकॅड कोर्स पुणे केल्याचे प्रमाणपत्र<br>क) मराठी भाषेचे ज्ञान आवश्यक<br>ड) अनुभव धारकास प्राधान्य |
| ३२ | **सर्वेअर**<br>(गट-क, तांत्रिक सेवा) | नामनिर्देशन १००% | अ) मान्यताप्राप्त विद्यापीठाची स्थापत्य (Civil) अभियांत्रिकी शाखेची पदविका किंवा माध्यमिक शालांत परीक्षा उत्तीर्ण व मान्यताप्राप्त औद्योगिक प्रशिक्षण संस्थेचे २ वर्षाचे सर्वेक्षक व्यवसायाचे प्रमाणपत्र<br>ब) मराठी भाषेचे ज्ञान आवश्यक<br>क) ०३ वर्षाचा अनुभव |
| ३३ | **ए. सी. ऑपरेटर**<br>(गट-क, तांत्रिक सेवा) | नामनिर्देशन १००% | अ) राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळाची माध्यमिक शालांत प्रमाणपत्र परीक्षा (SSC)<br>ब) शासन मान्य औद्योगिक प्रशिक्षण संस्थेचे यांत्रिक प्रशिक्षण व वातानुकुलीकरण या विषयाचे प्रमाणपत्र<br>क) मराठी भाषेचे ज्ञान आवश्यक<br>ड) अनुभवधारकास प्राधान्य |
| ३४ | **इलेक्ट्रीक सर्व्हीस ऑपरेटर**<br>(गट-क, तांत्रिक सेवा) | नामनिर्देशन १००% | अ) राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळाची माध्यमिक शालांत प्रमाणपत्र परीक्षा (SSC)<br>ब) शासन मान्य औद्योगिक प्रशिक्षण संस्थेचा इलेक्ट्रीक /वायरमन अभ्यासक्रम प्रमाणपत्र<br>क) मराठी भाषेचे ज्ञान आवश्यक<br>ड) अनुभवधारकास प्राधान्य |
| ३५ | **साऊंड सिस्टीम ऑपरेटर**<br>(गट-क, तांत्रिक सेवा) | नामनिर्देशन १००% | अ) राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळाची माध्यमिक शालांत प्रमाणपत्र परीक्षा (SSC)<br>ब) शासन मान्य औद्योगिक प्रशिक्षण संस्थेचा इलेक्ट्रीशियन कोर्स अभ्यासक्रम पुर्ण केल्याचे |

